**उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळाच्या अधिनस्त जिल्हा रुग्णालय, औरंगाबाद येथील ६ अस्थाई पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१५/प्र.क्र.४१/आरोग्य-४**
१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई.
तारीख: २७ एप्रिल, २०१५.

वाचा

१) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः जिरुप-१४०६/२१५/प्र.क्र.९७/आ-३, दि.१३.०७.२००६.**
२) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः पदआ-२००७/प्र.क्र.११७/सेवा-१, दि.२१.०९.२०१२.**
३) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः अपदे-२०१४/प्र.क्र.१३८/आरोग्य-४, दि.१४.०६.२०१४.**
४) **सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र, क्र.संआसे/कक्ष-३/टे-५/जिरुऔ.बाद/अपदे-६/सन२०१४-१५/५१३-१४/१५, दि.१४.०१.२०१५.**

प्रस्तावना

उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळाच्या अधिनस्त जिल्हा रुग्णालय, औरंगाबाद येथील ६ अस्थाई पदांचा संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये आकृतीबंधात समावेश करण्यात आला आहे. या अस्थाई पदांना संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये दि.१.०३.२०१५ ते दि.२९.०२.२०१६ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय

उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळाच्या अधिनस्त जिल्हा रुग्णालय, औरंगाबाद येथील ६ अस्थाई पदांना सदर पदे ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नव्हती वा अतिरिक्त कार्यभार दिलेली नाही तसेच तद् अनुषंगिक बाबींच्या त्रुटी आढळून आल्यास त्याची संपुर्ण जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिका-यांची राहील. या अटींच्या अधीन राहून दि.१.०३.२०१५ ते दि.२९.०२.२०१६ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

या पदांवरील खर्च सन २०१५-१६ या आर्थीक वर्षाच्या मागणी क्रमांक आर-१ मधील मुख्य लेखाशीर्ष " २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा, ११०-रूग्णालये व दवाखाने, ११०-२-मुफसल क्षेत्रातील रूग्णालये व दवाखाने, (०१)(०१)- मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रूग्णालये (२२१० ०१४६) " करीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय,क्र.असंक-१००४/ प्र.क्र.१२ ( भाग-२ )( २००४)/ वित्तिय सुधारणा-१, दि.४.१०.२००४ च्या अन्वये प्रशासकीय विभागप्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२४१४०८२७२३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.04.27 17:45:09 +05'30'

**संजय कमलाकर**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. सहसंचालक, आरोग्य सेवा ( रूग्णालये-राज्यस्तर ), मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
४. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र ( लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, औरंगाबाद.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
९. वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).

सार्वजनिक आरोग्य विभाग शा.नि.क्रं.अपदे-२०१५/प्र.क्र.७९/आरोग्य-४ दि. 22/[illegible]/१५. चे सहपत्र

सामान्य रुग्णालय औरंगाबाद येथील अस्थाई ०६ पदे

| अ. क. | तात्पुरते पदे प्रथमतः ज्या शासननिर्णअन्वये निर्माण केली तो शासन क्र.व दिनांक | पदनाम | संख्या | वेतन श्रेणी | लेखाशिर्ष |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | शा.नि.क्र.युडीपीएचडी/क्र. एचएस्सी/२१७०/२६४४ पीएच-३दि ३०/७/७७ | १) निवासी वैद्यकीय अधिकारी वर्ग - १ | १ | १५६०० - ३९१०० (६६००) | २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा, ११० - रुग्णालये व दवाखाने, ११०-२ - मुफसल क्षेत्रातील रुग्णालये व दवाखाने (०१)(०१) - मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये (२२१००१४६) |
| २ | शा. नि.क्र. एचएसपी-१०८४/४२३२/पीएच-३,दि १९/११/१९८५ अन्वये श्रेणीवर्धीत केलेले पद | २)अधिपरिचारिका वर्ग -३ | १ | ९,३००-३४१०० (४२००) | |
| | | ३) औषध निर्माण अधिकारी वर्ग -३ | १ | ५२००-२०२०० (२८००) | |
| | | ४) सफाईगार वर्ग -४ | १ | ४४००-७४०० (१३००) | |
| | | ५) कक्षसेवक वर्ग -४ | १ | ४४००-७४०० (१३००) | |
| ३ | शा. नि.क्र. सिम/१०४९/सीआर-१२०/आरोग्य-३/दिनांक १४/३/१९९५ | ६) वाहन चालक वर्ग -३ | १ | ५२००-२०२०० (१९००) | |
| | | | ६ | | |